.

**प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद या कार्यालयासाठी प्रादेशिक कार्यालय प्रमुख तसेच, आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक आस्था-१९२०/प्र.क्र.२९/ रेशीम कक्ष**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १३ जुलै, २०२०

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. रेशीम-१३१२/ प्र.क्र.१२६/ रेशीम कक्ष, दि. ०९ जानेवारी, २०१३.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३ / प्र.क्र.३०/ २०१३/ विनिमय, भाग-२ , दि. १७ एप्रिल,२०१५.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. आस्था-२०१९/ प्र.क्र.५०/ रेशीम कक्ष , दि.१८ सप्टेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

रेशीम संचालनालयांतर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेल्या प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद या कार्यालयासाठी संदर्भाधीन दि.०९.०१.२०१३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे सहायक संचालक (गट-अ) यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तथापि, औरंगाबाद विभागात रेशीम शेतीला शेतकऱ्यांकडून मिळणारा प्रतिसाद व त्यानुषंगाने औरंगाबाद विभागात रेशीम शेती व उद्योगासाठी प्रामुख्याने उभारण्यात येणाऱ्या विविध पायाभुत सुविधा लक्षात घेता औरंगाबाद येथील प्रादेशिक रेशीम कार्यालयाचे मजबुतीकरण करण्यासाठी संदर्भाधीन दि.१८.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे नागपूर येथील मुख्यालयातील उप संचालक (तुती) हे पद प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद येथे स्थलांतरीत करण्यात आले असून सदर कार्यालयाच्या कार्यालय प्रमुखाचे पदनाम उपसंचालक, औरंगाबाद असे करण्यात आले आहे. तसेच, सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद हे पद रेशीम संचालनालय, नागपूर येथे स्थलांतरीत करण्यात आले असून रेशीम संचालनालयातील हे पदनाम सहायक संचालक (तुती) असे करण्यात आले आहे. सबब, उपसंचालक (गट-अ), प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद यांना प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद या कार्यालयाचे "प्रादेशिक कार्यालय प्रमुख" तसेच, "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

उपसंचालक (गट-अ), प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद यांना प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद या कार्यालयाचे "प्रादेशिक कार्यालय प्रमुख" तसेच, "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय , हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनिमय, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील भाग १, उपविभाग-१, अ.क्र.३, नियम क्र.२ अन्वये प्रशासनिक विभागास दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१३१५०२१९९००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Daulat Patil

Digitally signed by Kishor Daulat Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d62fbb023999c9d217eee24b15e7b99adc0cdc4a7188393583aa1bbab889b6a8, serialNumber=4acebae058f9790422d1385b04baa7b606c3951ca0fde91204ace3bb2ee4b2c5, cn=Kishor Daulat Patil
Date: 2020.07.13 15:57:53 +05'30'

**(कि. दौ. पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा
६) सर्व मा. विधान परिषद सदस्य/ विधानसभा सदस्य
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १- (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई.
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), नागपूर
११) वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी), बाह्य लेखापरीक्षा विभाग (नागरी), मुंबई.
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४) निवासी लेखाधिकारी, मुंबई
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे.

१६) वित्त विभाग (व्यय-१६/ व्यय-२/ अर्थसंकल्प कार्यासन-३ व १२/ कोषा-२/ कोषागरे/ वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.
१७) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई
१८) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर
१९) उप संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर
२०) उप संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद
२१) सर्व सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, नागपूर/अमरावती/पुणे.
२२) सर्व रेशीम विकास अधिकारी, जिल्हा रेशीम कार्यालय, श्रेणी-१/२,
२३) निवड नस्ती .